**दुष्काळ घोषित करण्याच्या निकषामध्ये व कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करणेबाबत ....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण - २०१७/प्र.क.१७३/२०१७/म-७**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २८ जून, २०१८

**वाचा -**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: एससीवाय - २०१३ / प्र.क्र.२०७ / म-७, दिनांक ३.११.२०१५
२) दुष्काळ व्यवस्थापन संहिता, २०१६ ( Manual for Drought Management 2016 )
३) शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक ७ ऑक्टोबर, २०१७
४) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक ०३-०१/२०१८-डीएम-१, दिनांक: २९.५.२०१८

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाने प्रकाशित केलेल्या दुष्काळ व्यवस्थापन संहिता, २०१६ मधील तरतुदी व निकष विचारात घेवून राज्यामध्ये दुष्काळ जाहीर करण्यासाठी शास्त्रीय निकष व सुधारित कार्यपध्दती संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयानुसार विहित करण्यात आली आहे. सदर कार्यपध्दतीनुसार सन २०१७ च्या खरीप व रब्बी हंगामामध्ये दुष्काळाचे मुल्यांकन करण्याची कार्यवाही करण्यात आलेली आहे. दुष्काळ व्यवस्थापन संहिता,२०१६ मधील दुष्काळ घोषित करण्यासाठी विहित करण्यात आलेल्या निकषाबाबत विविध राज्यांनी व्यक्त केलेली मते विचारात घेवून केंद्र शासनाने संदर्भाधीन क्रमांक ४ येथील पत्रान्वये दुष्काळ व्यवस्थापन संहिता,२०१६ मधील दुष्काळ मुल्यांकनासंदर्भातील निकषामध्ये काही सुधारण केलेल्या आहेत. सदर सुधारणा विचारात घेवून राज्यामध्ये दुष्काळाचे मुल्यांकन करण्याबाबत दिनांक ७.१०.२०१७ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सुचनांमध्ये सुधारणा करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये राज्यामध्ये दुष्काळाचे मुल्यांकन करण्यासाठी विहित केलेले निकष व कार्यपध्दती या शासन निर्णयान्वये पुढीलप्रमाणे सुधारित करण्यात येत असून खरीप २०१८ हंगामापासून पुढे राज्यामध्ये सदर सुधारित निकष विचारात घेवून दुष्काळाचे मुल्यांकन करण्याची कार्यवाही जिल्हास्तरीय व राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समिती यांनी करावी. जिल्हास्तरीय समित्यांनी दुष्काळ मुल्यांकनाची संबंधित जिल्हयांची माहिती राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समितीकडे सादर करण्यासाठी सुधारित प्रपत्र-अ व प्रपत्र-ब सोबत जोडले आहेत. सुधारित प्रपत्रामध्ये मुल्यांकनाचा तपशील विहित कालमर्यादेत राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समितीकडे पाठविण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२. संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या सुचनांमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत :

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>प्रचलित तरतूद ( शासन निर्णय, दिनांक ७.१०.२०१७ मधील तरतुद व परिच्छेद क्रमांक )</th><th>सुधारणा</th></tr>
<tr><td>१.</td><td><u>परिच्छेद क्रमांक २(२)(१)</u><br><br>➢ $NDVI_{dev}$/$NDWI_{dev}$ यांचे परिमाण - २०% ते - ३०% असल्यास मध्यम दुष्काळ सुचित होतो (Moderate Drought Condition). तसेच हे मूल्य - ३०% पेक्षा कमी असल्यास गंभीर दुष्काळ सुचित होतो (Severe Drought Condition). या विचलनाचे मूल्य - २०% पेक्षा अधिक असल्यास परिस्थिती सामान्य असल्याचे सूचित होते.</td><td>$NDVI_{dev}$/$NDWI_{dev}$ यांचे मुल्यानुसार दुष्काळ सुचित होणारी वर्गवारी खालीलप्रमाणे राहील:<br><table>
<tr><th>$NDVI_{dev}$ / $NDWI_{dev}$</th><th>दुष्काळ वर्गवारी ( Drought Category )</th></tr>
<tr><td>> - २०</td><td>सामान्य (Normal)</td></tr>
<tr><td>- २० to - ३०</td><td>मध्यम दुष्काळ (Moderate)</td></tr>
<tr><td>< - ३०</td><td>गंभीर दुष्काळ (Severe)</td></tr>
</table></td></tr>
<tr><td>१</td><td><u>परिच्छेद क्रमांक २(२)(२)</u><br><br>➢ वनस्पती स्थिती निर्देशांक (VCI) चे वरील सूत्रानुसार येणारे मूल्य विचारात घेवून त्यांच्या मूल्यानुसार वनस्पती स्थितीची वर्गवारी खालीलप्रमाणे राहील :<br><table>
<tr><th>वनस्पती स्थिती निर्देशांक (VCI) (%)</th><th>वनस्पती स्थिती</th></tr>
<tr><td>६०-१००</td><td>चांगले (Good)</td></tr>
<tr><td>४०-६०</td><td>साधारण (Fair)</td></tr>
<tr><td>२०-४०</td><td>वाईट (Poor)</td></tr>
<tr><td>०-२०</td><td>अतिशय वाईट (Very Poor)</td></tr>
</table></td><td>➢ वनस्पती स्थिती निर्देशांक (VCI) चे वरील सूत्रानुसार येणारे मूल्य विचारात घेवून त्यांच्या मूल्यानुसार वनस्पती स्थितीची वर्गवारी खालीलप्रमाणे राहील :<br><table>
<tr><th>वनस्पती स्थिती निर्देशांक (VCI) (%)</th><th>वनस्पती स्थिती</th></tr>
<tr><td>६०-१००</td><td>सामान्य (Normal)</td></tr>
<tr><td>४०-६०</td><td>मध्यम (Moderate)</td></tr>
<tr><td>०-४०</td><td>गंभीर (Severe)</td></tr>
</table></td></tr>
<tr><td>२</td><td><u>परिच्छेद क्रमांक २(२)(२)(ब)</u><br>➢ राज्याच्या पीक पेरणीच्या वेळापत्रकानुसार ऑगस्ट अखेरपर्यंत राज्यामध्ये खरीप हंगामात पेरणी होणारे सामान्य/सरासरी क्षेत्र व संबंधित वर्षामध्ये ऑगस्ट अखेर खरीप हंगामात प्रत्यक्ष पेरणी झालेल्या क्षेत्राचे प्रमाण ३३.३% किंवा त्यापेक्षा कमी असल्यास अशी परिस्थिती</td><td>➢ राज्याच्या पीक पेरणीच्या वेळापत्रकानुसार ऑगस्ट अखेर खरीप हंगामात प्रत्यक्ष पेरणी झालेल्या क्षेत्राचे सामान्य क्षेत्राशी ( Normal ) प्रमाण ८५ % किंवा त्यापेक्षा कमी असल्यास मध्यम स्वरूपाचा दुष्काळ असल्याचे सुचित होईल.</td></tr>
</table>

<table>
<tr>
<td></td>
<td>दुष्काळी परिस्थिती सूचित करते. मात्र हेच प्रमाण ५०% पेक्षा कमी असल्यास गंभीर दुष्काळ सूचित करते.<br>➢ रब्बी हंगामाच्या बाबतीत डिसेंबर अखेर पेरणी होणारे सरासरी क्षेत्र व प्रत्यक्ष पेरणी झालेल्या क्षेत्राचे प्रमाण ५०% पेक्षा कमी असल्यास अशी स्थिती दुष्काळी परिस्थिती सूचित करते</td>
<td>मात्र हेच प्रमाण ७५ % पेक्षा कमी असल्यास गंभीर दुष्काळ सूचित करेल.<br>➢ रब्बी हंगामाच्या बाबतीत डिसेंबर अखेर प्रत्यक्ष पेरणी झालेल्या क्षेत्राचे सामान्य क्षेत्राशी ( (Normal) प्रमाण ८५ % किंवा त्यापेक्षा कमी असल्यास मध्यम स्वरूपाचा दुष्काळ असल्याचे सुचित होईल. मात्र हेच प्रमाण ७५ % पेक्षा कमी असल्यास गंभीर दुष्काळ सूचित करते.</td>
</tr>
<tr>
<td>३</td>
<td><u>परिच्छेद क्रमांक २(२)(२) (क)</u><br>➢ आर्द्रता पुरेशीपणा निर्देशांक (Moisture Adequacy Index) चे मूल्य विचारात घेवून त्यांच्या मूल्यानुसार कृषीविषयक दुष्काळाची वर्गवारी खालीलप्रमाणे राहील :
<table>
<tr><th>आर्द्रता पुरेशीपणा निर्देशांक (Moisture Adequacy Index) (%)</th><th>कृषीविषयक दुष्काळ वर्गवारी (Agricultural Drought Class)</th></tr>
<tr><td>७६-१००</td><td>दुष्काळ नाही</td></tr>
<tr><td>५१-७५</td><td>सौम्य दुष्काळ(Mild)</td></tr>
<tr><td>२६-५०</td><td>मध्यम दुष्काळ (Moderate)</td></tr>
<tr><td>०-२५</td><td>गंभीर दुष्काळ (Severe)</td></tr>
</table>
</td>
<td>➢ आर्द्रता पुरेशीपणा निर्देशांक (Moisture Adequacy Index) चे मूल्य विचारात घेवून त्यांच्या मूल्यानुसार कृषीविषयक दुष्काळाची वर्गवारी खालीलप्रमाणे राहील :
<table>
<tr><th>आर्द्रता पुरेशीपणा निर्देशांक (Moisture Adequacy Index) ( MAI ) in %</th><th>कृषीविषयक दुष्काळ वर्गवारी (Agricultural Drought Class)</th></tr>
<tr><td>७६-१००</td><td>दुष्काळ नाही</td></tr>
<tr><td>५१-७५</td><td>मध्यम दुष्काळ (Mild)</td></tr>
<tr><td>०-५०</td><td>गंभीर दुष्काळ (Severe)</td></tr>
</table>
</td>
</tr>
<tr>
<td>४</td>
<td><u>परिच्छेद क्रमांक ३(२) दुसरा टप्पा</u><br>➢ ४ प्रभावदर्शक निर्देशाकांपैकी खराब स्थिती दर्शविणारे ३ निर्देशांक व अशा निवडलेल्या ३ निर्देशांकामधील खराब स्थिती दर्शविणारे कोणतेही एकच निर्देशांक विचारात घेण्यात यावे.<br>➢ प्रभावदर्शक निर्देशांकापैकी खराब स्थिती दर्शवित असल्यामुळे निवडलेल्या ३</td>
<td>➢ वनस्पतीशी निगडीत निर्देशांक , लागवडीखालील क्षेत्र , मृदु आर्द्रता निर्देशांक व जलविषयक निर्देशांक या ४ प्रभावदर्शक निर्देशाकांपैकी वाईट स्थिती दर्शविणारे कोणतेही ३ निर्देशांक विचारात घेण्यात यावेत. वनस्पतीशी निगडीत निर्देशांकामधील NDVI dev / NDWI dev/</td>
</tr>
</table>

| | | |
|---|---|---|
| | निर्देशांकाच्या परिमाणांवर/मूल्यांवर खालीलप्रमाणे दुष्काळाचे स्वरूप व तीव्रता अवलंबून असेल:<br><br>१. **<u>गंभीर दुष्काळ</u>** - निवडलेल्या सर्व तीनही निर्देशांकाचे मूल्य "गंभीर" वर्गवारीत येत असल्यास<br>२. **<u>मध्यम दुष्काळ</u>** - निवडलेल्या तीन निर्देशांकापैकी कोणतेही २ निर्देशांक "मध्यम" किंवा "गंभीर" वर्गवारीत येत असल्यास<br>३. **<u>सामान्य परिस्थिती</u>** - वर नमूद केलेल्या परिस्थिती व्यतिरिक्त | VCI (NDVI) /VCI(NDWI) या चारपैकी वाईट स्थिती दर्शविणाऱ्या एकाच निर्देशांकाचे मुल्य विचारात घेण्यात यावे.<br>➢ ४ प्रभावदर्शक निर्देशांपैकी वरीलप्रमाणे निवडलेल्या कोणत्याही ३ निर्देशांकाच्या मुल्यांवर दुष्काळाची तीव्रता खालीलप्रमाणे अवलंबून असेल :<br>१. **<u>गंभीर दुष्काळ</u>** - निवडलेल्या ३ निर्देशांकापैकी कोणत्याही २ निर्देशांकाचे मूल्य "गंभीर" वर्गवारीत व उरलेले १ निर्देशांक "मध्यम " वर्गवारीत येत असल्यास "गंभीर " दुष्काळ सुचित होईल व दुष्काळाची दुसरी कळ लागू होईल.<br>२. **<u>मध्यम दुष्काळ</u>** - निवडलेल्या ३ निर्देशांकापैकी कोणतेही २ निर्देशांक किमान " मध्यम " वर्गवारीत येत असल्यास " मध्यम" दुष्काळ सुचित होईल व दुष्काळाची दुसरी कळ लागू होईल.<br>३. **<u>सामान्य परिस्थिती</u>** - वर नमूद केलेल्या परिस्थिती व्यतिरिक्त इतर प्रकरणी |
| ५. | **<u>परिच्छेद क्रमांक ३(३) : तिसरा टप्पा (Ground Truthing or Verification)</u>**<br><br>➢टप्पा एक व टप्पा दोन यांच्या मूल्यांकनाअंती राज्य शासनास राज्य स्तरीय समितीकडून प्राप्त झालेला अहवाल विचारात घेतल्यानंतर, दुसऱ्या टप्प्याच्या मूल्यांकनाअंती जिल्हयातील ज्या ज्या तालुक्यामध्ये " मध्यम" किंवा " गंभीर" दुष्काळ सुचित होत असेल अशा तालुक्यामधील **<u>गावातील पीकांचे क्षेत्रिय सर्वेक्षण करण्याबाबत राज्य शासनाकडून संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना कळविले जाईल</u>**.<br>➢राज्य शासनाकडून कळविण्यात आल्यानंतर जिल्हाधिकाऱ्यांकडून संबंधित तालुक्यातील गावातील पीकांचे क्षेत्रिय सर्वेक्षण करण्यात यावे.<br>➢दुष्काळाने प्रभावित झालेल्या गावांमधून रॅडम पध्दतीने १०% गावे निवडून अशा प्रत्येक | ➢ टप्पा एक व टप्पा दोन यांच्या मुल्यांकनाअंती राज्यातील ज्या तालुक्यामध्ये "मध्यम" किंवा "गंभीर" दुष्काळ असल्याचे सुचित करणारी दुसरी कळ (trigger 2) लागू झाल्याचे जिल्हास्तरीय दुष्काळ देखरेख समितीच्या अहवालावरून निर्दशानास येईल, अशा तालुक्यांमधील पीकांचे प्रत्यक्ष क्षेत्रीय सर्वेक्षण/सत्यापन खाली दिलेल्या कार्यपध्दतीने करण्याच्या सुचना तातडीने **राज्य स्तरीय दुष्काळ मुल्यांकन देखरेख समिती /आयुक्त (कृषी) यांचेकडून संबंधित जिल्हयांना देण्यात येतील. यासंदर्भात राज्य शासनाकडून कळविले जाण्याची आयुक्त** |

| | | |
|---|---|---|
| | गावातील प्रत्येक प्रमुख पिकांसाठी ५ ठिकाणे निवडून तेथील पिकांचे सर्वेक्षण करून पिक नुकसानीच्या स्थितीची छाननी/तपासणी करावी. एक एकरपेक्षा कमी क्षेत्र असलेल्या isolated शेतीचे सर्वेक्षण टाळावे.<br>➢ विशिष्ट मोबाईल ॲपचा वापर करून हे सर्वेक्षण करण्यात यावे. अशा क्षेत्रातील पिकांची स्थिती दर्शविणारे छायाचित्र व सर्वेक्षण करण्यात येत असलेल्या क्षेत्राचे/ठिकाणाचे GPS Coordinates येतील, अशा पध्दतीने मोबाईल ॲपच्या सहाय्याने छायाचित्रे घेण्यात यावीत. सदर GPS coordinates व पिकांची छायाचित्रे ही मापदंडे नंतरच्या विश्लेषणासाठी संगणकीय प्रणालीमध्ये upload करण्यायोग्य राहतील याचीही दक्षता घेण्यात यावी.<br>➢ या सर्वेक्षणाअंती पीकनुकसानीचे प्रमाण ३३% पेक्षा जास्त दिसून आल्यास अशी गावे दुष्काळी म्हणून घोषित केली जाण्यास पात्र असतील. पीकनुकसानीचे प्रमाण ५०% पेक्षा जास्त असल्यास दुष्काळाची तीव्रता गंभीर समजली जाईल. हंगामी/सुधारित किंवा अंतिम पैसेवारी काढण्याच्या कालावधीत असे सर्वेक्षण करण्याची वेळ आल्यास दोन्ही सर्वेक्षणे एकाचवेळी करण्यात यावीत.<br>➢ वरीलप्रमाणे गावनिहाय केलेल्या सर्वेक्षणानंतर गावनिहाय पीकनुकसानीचा तपशील, दुष्काळ व्यवस्थापन संहिता २०१६ सोबतच्या परिशिष्ट १ मधील नमुना क्रमांक ११ मध्ये तयार करावा व शासनास कोणत्याही परिस्थितीत खरीप हंगामाच्या बाबतीत दिनांक २० ऑक्टोबर पूर्वी व रब्बी हंगामाच्या बाबतीत दिनांक २० मार्च पूर्वी पाठवावा. | **(कृषी) अथवा संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी प्रतिक्षा करू नये.**<br>**<u>सत्यापन ( Ground truthing)</u>**<br>➢ टप्पा एक व टप्पा दोन यांच्या मुल्यांकनाअंती, "मध्यम" किंवा "गंभीर" दुष्काळ असल्याचे सुचित करणारी दुसरी कळ (trigger 2) लागू झालेल्या तालुक्यातील एकूण गावांपैकी रॅडम पध्दतीने १०% गावे निवडून अशा प्रत्येक गावातील प्रत्येक प्रमुख पिकांसाठी ५ ठिकाणे (sites) निवडावीत. अशा निवडलेल्या ठिकाणावरील (sites) पिकांचे सर्वेक्षण करून डेटा गोळा करावा. एक एकरपेक्षा कमी क्षेत्र असलेल्या isolated शेतीचे सर्वेक्षण टाळावे.<br>➢ हंगामातील पिकांची कापणी होण्यापूर्वी असे सर्वेक्षण/सत्यापन करण्यात यावे.<br>➢ विशिष्ट मोबाईल ॲपचा वापर करून हे सर्वेक्षण करण्यात यावे. अशा क्षेत्रातील पिकांची स्थिती दर्शविणारे छायाचित्र व सर्वेक्षण करण्यात येत असलेल्या क्षेत्राचे/ठिकाणाचे GPS Coordinates येतील, अशा पध्दतीने मोबाईल ॲपच्या सहाय्याने छायाचित्रे घेण्यात यावीत. सदर ठिकाणाचे GPS coordinates व पिकांची छायाचित्रे ही संगणकीय प्रणालीमध्ये नंतरच्या विश्लेषणासाठी upload करण्यायोग्य राहतील याची दक्षता घेण्यात यावी.<br>➢ वरील पध्दतीने पिकांचे सर्वेक्षण/सत्यापन करण्यासाठी, आयुक्त (कृषी) यांनी सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना कार्यपध्दती विहित करून दयावी तसेच या सत्यापनासाठी मोबाईल ॲप निश्चित करून दयावे. प्रधानमंत्री पिक विमा योजनेसाठी मोबाईल ॲपचा वापर करण्यात येत असल्यास, सदर |

| | | |
|---|---|---|
| | | मोबाईल ॲप या प्रकरणी सुध्दा वापरता येईल.<br>➢ वरील प्रमाणे केलेल्या सत्यापनाची (Ground truthing) गावनिहाय माहिती या शासन निर्णयासोबत जोडलेल्या नमुन्यात (प्रपत्र-क) संबंधित जिल्हयांनी राज्य दुष्काळ देखरेख समितीकडे पाठवावी.<br>➢ प्रतिनिधिक स्वरूपात केलेल्या या सत्यापनामध्ये/सर्वेक्षणामध्ये पीक **नुकसानीचे अंदाजित प्रमाण ३३% पेक्षा** जास्त दिसून आल्यास अशी परिस्थिती **मध्यम स्वरूपाचा दुष्काळ** म्हणून घोषित केली जाण्यास पात्र असेल.<br>➢ मात्र पीक नुकसानीचे अंदाजित प्रमाण ५०% पेक्षा जास्त दिसून आल्यास दुष्काळाची तीव्रता गंभीर समजली जाईल. तसेच सत्यापनाच्या (Ground Truthing) एकूण प्रयोगापैकी ८०% प्रयोगामध्ये पीक नुकसानीचे अंदाजित प्रमाण ५०% पेक्षा जास्त दिसून आल्यास दुष्काळाचे स्वरूप मध्यम वरून गंभीर समजण्यात येईल.<br>➢ सत्यापन (Ground Truthing) हे, दुष्काळ निश्चित करण्यासाठी तंत्रज्ञानाचा वापर करून केले जाणारे वस्तुनिष्ठ स्वरूपाचे प्रयोग आहेत. याचा आणि पारंपारिक पैसेवारी पध्दतीचा काही संबंध नाही.<br>➢ पैसेवारीचा उपयोग दुष्काळाचे परिणाम निश्चित करण्यासाठी तसेच लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी केला जाऊ शकतो.<br>➢ हंगामाच्या मध्यावधीमध्ये दुष्काळाची शक्यता (early season drought) वगळता अशी कार्यवाही सप्टेंबर महिन्यांच्या निर्देशांकाच्या मुल्यावर आधारित करण्यात यावी.<br>➢ वरीलप्रमाणे सत्यापनाची (Ground truthing) ची माहिती जिल्हयांकडून प्राप्त झाल्यानंतर, राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख |

| | | |
|---|---|---|
| | | समिती /आयुक्त (कृषी) यांनी खालील तपशीलासह त्यांचा प्रस्ताव अपर मुख्य सचिव/सचिव (मदत व पुनर्वसन ) यांना खरीप हंगामाच्या बाबतीत दिनांक २० ऑक्टोबर पर्यंत व रब्बी हंगामाच्या बाबतीत दिनांक २० मार्च पर्यंत पाठवावा:<br>१) ज्या तालुक्यांमध्ये दुष्काळाची पहिली कळ लागू झाली आहे **अशा सर्व तालुक्यांची सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये तपशीलासह माहिती** २) ज्या तालुक्यांमध्ये दुष्काळाची पहिली कळ लागू झाली आहे **अशा सर्व तालुक्यांची सोबत जोडलेल्या प्रपत्र-ब मध्ये तपशीलासह माहिती**<br>३) ज्या तालुक्यांमध्ये मध्यम किंवा गंभीर स्वरूपाच्या दुष्काळाची दुसरी कळ लागू झाल्यामुळे सत्यापन करण्याच्या सुचना आयुक्त (कृषी) यांनी दिलेल्या असतील अशा **तालुक्यांमधील सत्यापनाचा (Ground Truthing) गावनिहाय तपशील (या शासन निर्णयासोबत जोडलेले प्रपत्र - क ).**<br>४) सत्यापनाअंती ज्या तालुक्यामध्ये गंभीर अथवा मध्यम स्वरूपाचा दुष्काळ निष्पन्न होत असेल अशा तालुक्यामधील शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदान देण्यासाठी **NDRF मधून मदत मागण्यासाठी मदतीचे ज्ञापन (Memorandum).** |
| ६ | **परिच्छेद क्रमांक ५**<br>विविध जिल्हास्तरीय समित्यांकडून दरमहा प्राप्त होणारा तपशील, राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समितीच्या सदस्य सचिवांकडून राज्यस्तरीय समितीस सादर केला जाईल. सदर तपशीलाच्या आधारे राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समितीकडून अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांना पाठविण्यात येणाऱ्या अहवालात दुष्काळ घोषित करण्याबाबत व दुष्काळाच्या तीव्रतेबाबत शिफारस करेल. | विविध जिल्हास्तरीय समित्यांकडून दरमहा प्राप्त होणारा तपशील, राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समितीच्या सदस्य सचिवांकडून राज्यस्तरीय समितीस सादर केला जाईल. राज्य स्तरीय दुष्काळ देखरेख समिती कडून उपरोक्त अनुक्रमांक ५ मध्ये नमूद केलेल्या सुधारणेनुसार सविस्तर तपशीलासह त्यांचा अहवाल विहित केलेल्या दिनांकापर्यंत अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांना पाठविण्यात यावा. |

३. उपरोक्त सुधारणा विचारात घेवून सर्व संबंधितांनी काटेकोरपणे कार्यवाही करावी व विहित कालावधीत अहवाल शासनास पाठविण्यात यावेत जेणेकरून दुष्काळाची परिस्थिती असल्यास विहित केलेल्या कालावधीत राज्यामध्ये दुष्काळ घोषित करण्याची कार्यवाही करता येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२८१२२०१६९३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2018.06.28 13:03:47 +05'30'

**( सु.ह.उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन,मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,मंत्रालय,मुंबई ,
३. मा विरोधी पक्ष नेते, विधानसभा/विधान परिषद, विधानभवन,मुंबई,
४. महाराष्ट्र विधानमंडळातील सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य,
५. मा.मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
७. अपर मुख्य सचिव (महसूल), महसुल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई
८. अपर मुख्य सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई,
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग
१०. विभागीय आयुक्त,कोकण/पुणे/औरंगाबाद/नागपूर/अमरावती/नाशिक
११. आयुक्त (कृषी),महाराष्ट्र राज्य,पुणे,
१२. आयुक्त (पशुसंवर्धन),महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे,
१४. संचालक, महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग अप्लीकेशन सेंटर,नागपूर,
१५. मुख्य अभियंता,जलविज्ञान प्रकल्प, नाशिक
१६. सर्व जिल्हाधिकारी
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व जिल्हा परिषद
१८. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
१९. संचालक (कृषी),महाराष्ट्र राज्य,पुणे
२०. संचालक,आपत्ती व्यवस्थापन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
२१. मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
२२. मा.राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
२३. निवड नस्ती (कार्यासन / म - ७).

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक :संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१७३/म-७, दिनांक: २८ जून, २०१८ चे प्रपत्र-अ

**Monitoring of Mandartory Indicators for Drought Assessment in Maharshtra (To be Filled for every Month From June)**

**प्रपत्र –अ (PROFORMA - A)**

Month - June/July/August/September

| | | Mandatory Indicators | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **District** | **Taluka** | Rainfall Deviation. Rainfall deviation (Rfdev)= (Rfi-RFn)/RFn x 100 ( Rfi is actual rainfall received cumulatively till end of the assessment month in mm and RFn is normal rainfall cumulatively for the same month in mm | Category of Rainfall Deviation Normal/Deficient/Scanty (Deviation upto -19% is Normal, -20% to -59% is Deficient, -60% to-99% is scanty (N/D/S) | Dry Spell of 4 weeks (upto 3 weeks in case of light soils) Yes /No and mention the period of dry spell | **Drought Trigger I Yes/No** | Percentage of total rainfall received during months of June and July to the normal rainfall of June and July . (If the value is less than 50%, then the trigger will be yes, irrespective of dry spell ) | percentage of actual total rainfall received during months from June to september to the normal rainfall of this period (If the value is less than 75%, then the trigger will be yes, irrespective of dry spell) | **Drought Trigger I Yes/No** |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |

| | शासन निर्णय,महसुल व वन विभाग, क्रमांक: संकीर्ण-2017/प्र.क्र.173/म-7, दिनांक: 28 जून, 2018 चे प्रपत्र-ब | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | Monitoring of Impact Indicators for Drought Assessment in Maharshtra (To be Filled for every Month From June) | | | | | | | | | | | | | | | | |
| Month - June/July/August/September | | | | | प्रपत्र - ब (PROFORMA-B) | | | | | | | | | | | | | |
| | | Impact Indicators | | | | | | | | | | | | | | | | |
| | | Agriculture Related Index | | | | Remote Sensing based Index | | | | | | | | | Soil Moisture based Index | | Hydrological Index | |
| District | Name of Taluka where the Drought Trigger 1 is Yes as per PROFORMA-A taluka | actual Crop area sown (Talukawise) by the end of August (in hect.) | Normal sown area (Talukawise ) by the end of August (in hect.) | Percentage of actual crop area sown to the normal sown area by end of August | Category (Normal/Moderate/ Severe) ( Normal if the value of column 5 is more than 85%, Moderate if the value is less than 85 % and Severe if the value is 75% ) | VCI (NDVI) for the reporting month (Talukawise) | VCI (NDWI) for the reporting month (Talukawise) | Poorer of the two values of VCI (NDVI) and VCI(NDWI) (The poorer of the two values in column 7 and 8 may be taken) | Category of VCI (Normal/Moderate/Severe)( value in the range of 60-100 is Normal, 40-60 is Moderate , 0-40 is Severe ) | NDVI Deviation for the reporting month (Talukawise) | Category of NDVI (Normal/Moderate/ Severe) ( value in the range of >-20 is Normal, -20 to -30% is Moderate , <-30% is severe | NDWI Deviation for the reporting month (Talukawise) | Category of NDWI (Normal/ Moderate/ Severe) ( value in the range of >-20 is Normal, -20 to -30% is Moderate , <-30% is severee | Poorer of the two values of NDVI and NDWI deviations (The poorer of the two values in column 11 and 13 should be taken) | Moisture Adequacy Index (MAI) (%) for the reporting month (Districtwise) | Category (Normal/Mild/ Moderate/Severe) ( the value in the range of 76-100% is Normal, 51-75% is Moderate, 0-50 % is severe | Groundwater Drought Index (GWDI)for the reporting month (Talukawise ) | Category (Normal/Mild/ Moderate/Severe /Extreme)(> -0.15 is Normal, -0.16 to -0.30 is Mild, -0.31 to -0.45 is Moderate, -0.46 to -0.60 is severe and < -0.60 is Extreme |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 | 13 | 14 | 15 | 16 | 17 | 18 | 19 |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | | |

**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण - २०१७/प्र.क.१७३/२०१७/म-७, दिनांक: २८ जून २०१८**

**<u>प्रपत्र - क</u>**

शेतीपिकांच्या नुकसानीचा तपशील (Ground Truthing Details )

गावाचे नाव .....................    तालुका ..........................    जिल्हा....................................

| प्रमुख पिकाचे नाव | लागवडीचे सामान्य क्षेत्र (Normal Sown area ) | सिंचनाखालील क्षेत्र | हंगामामध्ये पेरणी केलेले क्षेत्र | पिकाचे क्षेत्र (हेक्टर) | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | पेरणी न केलेले क्षेत्र | पेरणी केलेल्या क्षेत्रापैकी पिकांचे नुकसान झालेले क्षेत्र | ३३-५०% दरम्यान नुकसान झालेले क्षेत्र | ५०% पेक्षा अधिक नुकसान झालेले क्षेत्र |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |